**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग (खुद्द) मधील महिला कर्मचाऱ्यांच्या लैंगिक छळवणूकीच्या तक्रारींचे निवारण करण्यासाठी समितीची पुनर्रचना करण्याबाबत**

# महाराष्ट्र शासन

## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग

## शासन निर्णय क्रमांकः आस्था-२०१८/प्र.क्र.१५५/पापु-०१

७ वा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय इमारत संकुल, लोकमान्य टिळक मार्ग,
मंत्रालय, मुंबई- ४०० ००१
तारीख: १९ जून, २०२३.

**वाचा**:-

१) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांकः एसआरव्ही-१०९९/७३/मकअ, दिनांक १९/०५/१९९९

२) केंद्र शासनाचा कामाच्या ठिकाणी महिलांचे लैंगिक छळापासून संरक्षण (प्रतिबंध, मनाई आणि निवारण) अधिनियम-२०१३.

३) शासन निर्णय, महिला व बाल विकास विभाग क्रमांकः मकचौ-२०१३/प्र.क्र.६३/मकक, दिनांक १९/०६/२०१४.

४) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्रमांकः आस्था-२०१८/प्र.क्र.१५५/पापु-०१, दिनांक १३/१२/२०२२.

**प्रस्तावना:**

कामाच्या ठिकाणी महिलांच्या होणाऱ्या लैंगिक छळास प्रतिबंध करण्यासाठी, मा.सर्वोच्च न्यायालयाने विशाखा जजमेंट मधील मार्गदर्शक तत्वे शासनावर बंधनकारक केली आहेत. विशाखा जजमेंट मधील मार्गदर्शक तत्वानुसार, सुधारित महिला तक्रार निवारण समित्या गठीत करण्याच्या सूचना, महिला व बाल विकास विभागाच्या उपरोक्त वाचा मधील क्रमांक ३ येथील दिनांक १९ जून, २०१४ च्या शासन निर्णयान्वये देण्यात आल्या आहेत.

उपरोक्त वाचा मधील क्रमांक ४ येथील या विभागाच्या दिनांक १३ डिसेंबर २०२२ च्या शासन निर्णयान्वये, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग (खुद्द) साठी महिला तक्रार निवारण समितीची पुनर्रचना करण्यात आली आहे. तथापि, सदर समितीमधील काही अधिका-यांच्या पदामध्ये व काही अधिका-यांच्या पदस्थापनेत बदल झाला असल्यामुळे, सदर समितीची पुनर्रचना करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:**

शासकीय सेवेतील महिला कर्मचाऱ्यांना कामाच्या ठिकाणी होणाऱ्या लैंगिक छळवणूकीस प्रतिबंध करण्यासाठी सर्वोच्च न्यायालयाने दिलेल्या मार्गदर्शक सूचनांनुसार व महिला व बाल विकास विभागाच्या उपरोक्त वाचा मधील क्रमांक ३ येथील दिनांक १९ जून, २०१४ च्या शासन निर्णयातील तरतूदींनुसार,

विभागातील महिला कर्मचाऱ्यांकडून आलेल्या तक्रारींचे निवारण करण्यासाठी संदर्भाधीन क्रमांक ४ येथील दिनांक १३ डिसेंबर २०२२ च्या शासन निर्णयान्वये स्थापन करण्यात आलेल्या समितीची खालील प्रमाणे पुनर्रचना करण्यात येत आहे.

| अ.क्र. | अधिकारी/अशासकीय सदस्य यांचे नाव व पदनाम | समितीमधील पद |
|---|---|---|
| १ | श्रीमती अनुष्का दळवी, अवर सचिव | अध्यक्ष |
| २ | श्रीमती स्नेहा बोरगे, अवर सचिव | सदस्य |
| ३ | श्रीमती स्मिता बागुल, कक्ष अधिकारी | सदस्य |
| ४ | श्रीमती राजकुंवर डफळे, कक्ष अधिकारी | सदस्य |
| ५ | श्रीमती धनश्री चौगुले, मु. कुल्हे, पो. बारापाडा, ता.पनवेल, जि. रायगड. | सदस्य (विधीज्ञ) |
| ६ | श्रीमती नि:शंका सोनटक्के, कक्ष अधिकारी | सदस्य सचिव |

**०२. या विभागात काम करणाऱ्या महिला कर्मचाऱ्यांना त्यांच्या तक्रारी, वरील समितीच्या अध्यक्षांकडे किंवा सदस्य सचिवांकडे सादर करता येतील. विभागातील महिला कर्मचाऱ्यांना या शासन निर्णयाद्वारे कळविण्यात येते की, त्यांनी लैंगिक छळासंबंधी कोणतीही तक्रार असल्यास ती महिला तक्रार निवारण समितीकडे तात्काळ सादर करावी.**

**समितीची कार्यकक्षा पुढीलप्रमाणे राहील-**

१) सर्वोच्च न्यायालयाच्या मार्गदर्शक तत्वानुसार, महिलांच्या लैंगिक छळवणूकीस आळा घालण्यासाठी व कामाच्या ठिकाणी सुरक्षित वातावरण मिळावे, यासाठी आवश्यक उपाययोजना करणे.

२) लैंगिक छळवणूकीच्या तक्रारीची दखल घेणे.

३) तक्रारीत तथ्य आढळल्यास, त्याबाबत शोध घेऊन संबंधीतांविरुध्द शिस्तभंगाची कारवाई करण्याची शिफारस करणे.

४) शिस्तभंगाच्या कारवाईचा आढावा घेणे.

५) यासंबंधी केलेल्या कार्यवाहीचा अहवाल राज्य महिला तक्रार निवारण समितीस सादर करणे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०६१९१७५१२२७४२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RAJENDRA MAHADEV GENGAJE

Digitally signed by RAJENDRA MAHADEV GENGAJE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER SUPPLY AND SANITATION DEPARTMENT, 2.5.4.20=9e6d5121ea1547c5b6abac50546c582bc9cb02d8c4ee0e57eb3442ad725208b5, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=D90328C2FC4E73B881BCFEA3BC5824FA462A2EC1E4EAD4BFE3B4979112BDB493, cn=RAJENDRA MAHADEV GENGAJE
Date: 2023.06.20 15:36:46 +05'30'

**(राजेंद्र गेंगजे)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.

२. प्रधान सचिव, महिला व बाल विकास विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
३. अध्यक्षा, राज्य महिला तक्रार निवारण समिती, नवीन प्रशासकीय भवन, मंत्रालय, मुंबई.
४. श्रीमती धनश्री चौगुले, मु. कुल्हे, पो. बारापाडा, ता.पनवेल, जि. रायगड.
५. सर्व अधिकारी/कर्मचारी, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. निवडनस्ती, कार्यासन पापु-०१.